20100715141454001

RNI No. MAHBIL/2009/31748



# महाराष्ट्र शासन राजपत्र

# असाधारण भाग एक-अ—मध्य उप-विभाग

वर्ष २, अंक २० ] बुधवार, जून ३०, २०१०/आषाढ ९, शके १९३२ [ पृष्ठे ३, किंमत : रुपये २०.००

**असाधारण क्रमांक ८१**

**प्राधिकृत प्रकाशन**

**महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या, ग्रामपंचायती, नगरपरिषदा, प्राथमिक शिक्षण आणि स्थानिक निधी लेखापरीक्षा अधिनियम यांखालील (भाग चार-ब मध्ये प्रसिद्ध करण्यात आलेले आदेश व अधिसूचना यांव्यतिरिक्त) आदेश व अधिसूचना.**

**नगरविकास विभाग**

मंत्रालय मुंबई ४०० ०३२, दिनांक ३० जून २०१०

**अधिसूचना**

**महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५.**

क्रमांक एमएमसी. २००९ / १२४/प्र.क्र. ७०/नवि -३२.— ज्याअर्थी, महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी (दुसरी सुधारणा) अधिनियम, २००६ (२००६ चा महा. क्र. ४८) अन्वये सुधारणा केल्याप्रमाणे महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ (१९६५ चा महा. ४०) च्या कलम ५२ नुसार महाराष्ट्र नगरपरिषदा व नगरपंचायतीच्या अध्यक्ष पदाचा कालावधी दोन वर्षे, सहा महिने इतका आहे ;

आणि ज्याअर्थी, अनुसूचित जाती आणि अनुसूचित जमाती किंवा नागरिकांचा मागासप्रवर्ग किंवा महिलांसाठी राखीव असलेले नगरपरिषदा किंवा यथास्थिती नगरपंचायतींच्या अध्यक्षांचे पद सदर दोन वर्षे सहा महिन्यांच्या पूर्ण कालावधीसाठी राखीव ठेवणे इष्ट आहे आणि याकरिता महाराष्ट्र नगरपरिषदा आणि नगरपंचायती (अध्यक्ष पदाची निवडणूक) नियम, १९८१ च्या नियम २क मध्ये सुधारणा करणे आवश्यक आहे ;

आणि ज्याअर्थी, यासाठी उक्त अधिनियमाच्या कलम ३२१ च्या पोट-कलम (३) नुसार आवश्यक असल्याप्रमाणे पूर्व प्रसिद्धीच्या शर्तीचे पालन न करता या संदर्भात तातडीने कार्यवाही करणे आवश्यक झाले आहे अशी परिस्थिती अस्तित्वात असल्याबद्दल महाराष्ट्र शासनाची खात्री झाली आहे.

त्याअर्थी, आता, महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ (१९६५ चा महा. ४०) च्या कलम १७ व ३२१ द्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा आणि त्याबाबतीत महाराष्ट्र शासनास समर्थ करणाऱ्या इतर सर्व अधिकारांचा वापर करून महाराष्ट्र शासन याद्वारे महाराष्ट्र नगरपरिषदा व नगरपंचायती (अध्यक्ष पदाची निवडणूक) नियम, १९८१ मध्ये आणखी सुधारणा करण्यासाठी पुढील नियम करीत आहे, ते असे :—

१. या नियमांना महाराष्ट्र नगरपरिषदा व नगरपंचायती (अध्यक्ष पदाची निवडणूक) (सुधारणा) नियम, २०१० असे म्हणावे.

२. महाराष्ट्र नगरपरिषदा व नगरपंचायती (अध्यक्ष पदासाठी निवडणूक) नियम, १९८१ च्या नियम २ क मधील " एक वर्ष " या शब्दाऐवजी " दोन वर्षे सहा महिने " हे शब्द दाखल करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

**आ. श्रा. जिवने,**
शासनाचे उप सचिव.

## URBAN DEVELOPMENT DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 30th June 2010

*NOTIFICATION*

MAHARASHTRA MUNICIPAL COUNCILS, NAGAR PANCHAYATS AND INDUSTRIAL TOWNSHIPS ACT, 1965.

No. MMC. 2009/124/CR-70/09/UD-32.—Whereas, the term of office of the President of the Municipal Council and *Nagar Panchayat* provided under section 52 of the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships Act, 1965 (Mah. XL of 1965), as amended by the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships (Second Amendment) Act, 2006 (Mah. XLVIII of 2006) is two and half years ;

And whereas, it is expedient to provide that the office of the President of Municipal Council, or *Nagar Panchayat*, as the case may be, reserved for the Scheduled Castes, Scheduled Tribes or the Backward Class of Citizens or Women shall continue to be reserved for the said full term of two and half years ; and for that purpose to amend rule 2C of the Maharashtra Municipal Councils and *Nagar Panchayats* (President Election) Rules, 1981 ;

And Whereas, the Government of Maharashtra is satisfied that circumstances exist which render it necessary to take immediate action in that regard, by dispensing with the condition of previous publication thereof as required by sub-section (*3*) of section 321 of the said Act.

Now, therefore, in exercise of the powers conferred by section 17 read with section 321 of the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships Act, 1965 (Mah. XL of 1965) and of all other powers enabling it in that behalf, the Government of Maharashtra hereby makes the following rules further to amend the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* (President Election) Rules, 1981 as follows, namely :—

1. These rules may be called the Maharashtra Municipal Councils and *Nagar Panchayats* (President Election) (Amendment) Rules, 2010.

2. In rule 2C of Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* (President Election) Rules, 1981, for the words " one year " the words " two and half years " shall be substituted.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

A. S. JIWANE,

Deputy Secretary to Government.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A,NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004, EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI.